केरळ राज्य शासनाला महाराष्ट्र शासनाकडून रुपये १०.०० कोटी मदत अदा करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एससीवाय-०८/२०२४/प्र.क्र.५८ (भाग-२)/म-११

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०६ ऑगस्ट, २०२४

वाचा-

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्वि-२०२४/२२४५/प्र.क्र. ३८/ब-१, दि. ०५.८.२०२४.**

प्रस्तावना-

दि.३० जुलै, २०२४ रोजी केरळ राज्यामध्ये वायनाड जिल्ह्यात मुसळधार पावसामुळे भूस्खलन झाल्याच्या घटना घडल्या असून त्यामुळे मोठ्या प्रमाणात जिवित व वित्त हानी झाली आहे, तसेच जनजीवन व दळणवळणदेखील मोठ्या प्रमाणावर विस्कळीत झाले आहे. या नैसर्गिक आपत्तीमुळे उद्भवलेल्या परिस्थितीवर मात करण्यासाठी महाराष्ट्र शासनाकडून केरळ राज्यास मदत म्हणून रु.१०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

### शासन निर्णय-

दि.३० जुलै, २०२४ रोजी केरळ राज्यामध्ये वायनाड जिल्ह्यात मुसळधार पावसामुळे भूस्खलनाच्या घडलेल्या घटनांच्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र शासनाकडून रु.१०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतका निधी मुख्यमंत्री सहायता निधी, केरळ यांना मदत म्हणून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रयोजनासाठी आवश्यक असलेला निधी मागणी क्रमांक: सी-६; मुख्य लेखाशीर्ष २२४५, नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य; ८०, सर्वसाधारण; ८००, इतर खर्च; (९४) (०१) इतर राज्यांना आपत्ती निवारण मदतीसाठी सहाय्य (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) **(२२४५ २५४१)** या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या चालू वित्तीय वर्षामध्ये लेखाशीर्ष २२४५ ००७५ या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

३. सदर निधी आहरित करण्यासाठी लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांनी सदर रक्कम A/c Number : 67319948232; A/c Name: CHIEF MINISTER'S DISTRESS RELIEF FUND; ACCOUNT NO. 02; Branch: City Branch, Thiruvananthapuram; IFSC : SBIN0070028 | SWIFT CODE : SBININBBT08; Account Type: Savings | PAN: AAAGD0584M या खात्यामध्ये हस्तांतरित करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे औपचारिक संदर्भ क्र.३१२/२०२४/व्यय-९, दि.५.८.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०६१३००३७३६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN CHANGDEO KOLHE

Digitally signed by ARUN CHANGDEO KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=5954cbf120ac1f332056b65de0d4dfa85b619ad7d64fcd736ceb3dee77603425, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7AB6FCE2D956CE4C6E9BFC3EA1AB5FC2F17BEA07DB8AF21ACA4BEDED302CE9F9, cn=ARUN CHANGDEO KOLHE
Date: 2024.08.06 13:15:18 +05'30'

**( अरुण कोल्हे )**
**वित्तीय सल्लागार व सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, केरळ राज्य शासन.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर.
४. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई.
५. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
६. लेखाधिकारी ( आव्यप्र-६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. कक्ष अधिकारी, व्यय-९, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवडनस्ती कार्यासन म-११.